सार्वजानिक विभागाच्या अधिपत्याखालील राज्य सार्वजानिक आरोग्य प्रयोगशाळा, पुणे व जिल्हयातील प्रयोगशाळांचे बळकटीकरण करण्यासाठी राज्य शासनाचा ४० टक्के हिस्सा प्रमाणे रु.३१९.२४ लक्ष इतक्या रकमेस प्रशासकीय मंजूरी देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
### शासन निर्णय क्रमांकः पुरमा-२०२४/प्र.क्र. २७/आरोग्य-३अ

मंत्रालय, १० वा मजला, संकूल इमारत,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.
दिनांक : २६ मार्च, २०२४.

**वाचा :-**

१) उपसंचालक, आरोग्य सेवा, राज्य सार्वजानिक आरोग्य प्रयोगशाळा, पुणे यांचे पत्र क्र. जा.क्र. उसआसे/राआप्रशा/ अर्थसंकल्प/पुरवणी मागणी /४४२-४५/२०२४, दि.२४.०१.२०२४

२) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि. ०४.०३.२०२४.

३) अन्न सुरक्षा प्राधिकरण नवी दिल्ली यांचे अनुदान मंजूरी आदेश ED(CS)/१५/२०२२-२३, दि. १५.०५.२०२२

४) उपसंचालक, आरोग्य सेवा, राज्य सार्वजानिक आरोग्य प्रयोगशाळा पुणे यांचे पत्र क्र. जा.क्र.उसंआसे/रासाआप्रशा/कक्ष७६ई/पुरक मागणी माहिती सादर/२७६३/२०२४, दि. २३.०३.२०२४.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्यातील ३५ आरोग्य विभागाच्या सार्वजानिक आरोग्य प्रयोगशाळांमध्ये पाणी, रासायनिक व अनुजैविक तपासणी व आयोडिनयुक्त मीठ नमुणे तसेच पाणी शुध्दीकरणासाठी वापरली जाणारी रसायने जसे की विरंजक चूर्ण (TCL) सोडियम हायपोक्लोराईट P.A.C., तुरटी इत्यांदींची गुणवत्ता तपासणी या व्यतिरिक्त शौच नमुने, रक्त नमुने तपासणी आणि जलजन्य आजार व साथरोग नियंत्रण या संपूर्ण तपासणी करण्याची सुविधा उपलब्ध आहे. राज्य सार्वजानिक आरोग्य प्रयोगशाळा , पुणे व जिल्हयातील प्रयोगशाळांचे बळकटीकरण करण्यासाठी अन्न सुरक्षा प्राधिकरण नवी दिल्ली व मा. आयुक्त, अन्न औषध प्रशासन, पुणे यांचे मध्ये (MoU) सामंजस्य करार करण्यात आलेला आहे. सदर योजनेंतर्गत केंद्र शासन व राज्य शासन यांचा अनुक्रमे ६०:४० टक्के असा हिस्सा असणार आहे. या योजनेअंतर्गत सार्वजनिक आरोग्य विभागाच्या प्रयोगशाळांकरीता सन २०२२-२३ या वित्तीय वर्षाकरीता असून राज्य शासनाचा ४० टक्के हिस्सा रू. ३१९.२४ लक्ष इतके अनुदान मा. आयुक्त अन्न व औषध प्रशासन यांच्याकडे जमा करावयाचा आहे. त्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

राज्यातील सार्वजानिक आरोग्य प्रयोगशाळा, पुणे व जिल्हयातील आरोग्य प्रयोगशाळांचे बळकटीकरण करण्यासाठी, अन्न सुरक्षा प्राधिकरण नवी दिल्ली व मा. आयुक्त, अन्न औषध प्रशासन, पुणे

यांचे मध्ये (MoU) सामंजस्य करार करण्यात आलेला आहे. सदर योजनेंतर्गत केंद्र शासन व राज्य शासन यांचा अनुक्रमे ६०:४० टक्के असा हिस्सा असणार आहे. या योजनंतर्गत राज्य शासनाचा हिस्सा ४० टक्के प्रमाणे रू. ३१९.२४ लक्ष (अक्षरी रूपये तीन कोटी एकोणीस लक्ष चोवीस हजार फक्त) इतके अनुदान अन्न व औषध प्रशासन मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यास खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

**<u>अटी व शर्ती :-</u>**

१) अन्न सुरक्षा प्राधिकरण नवी दिल्ली यांनी मा. आयुक्त, अन्न औषध प्रशासन, पुणे यांच्या सोबत केलेल्या (MoU) सामंजस्य करारातील अटी व शर्ती प्रमाणणे केंद्र शासनाने ठरवून दिलेल्या बाबींवर खर्च करण्यात यावा.

२) सदर कामाची निविदा काढतांना प्रत्येक कामाची स्वतंत्रपणे निविदा न काढता नमूद सर्व कामांसाठी एकच निविदा काढण्यात यावी.

३) सदर काम मंजूर रकमेत पुर्ण होईल याची दक्षता घेण्यात यावी. तसेच सदर काम उपलब्ध निधी मधून करण्यात यावे.

४) शासन निर्णय, उद्योग उर्जा व कामगार विभाग दिनांक २४ ऑगस्ट, २०१७ अन्वये “वस्तू व सेवा खरेदीसाठी गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GEM) याची कार्यपध्दती व मार्गदर्शक सूचनांनुसार निविदेची कार्यवाही करण्यात यावी”

५) सदर उपकरणे यंत्र व इतर साहित्य सामुग्रीची खरेदी ही अन्न सुरक्षा प्राधिकरण नवी दिल्ली यांनी निश्चित केलेल्या मानकांनुसार उपसंचालक स्तरावर तसेच आवश्यकतेनुसार महाराष्ट्र वैद्यकीय वस्तु खरेदी प्राधिकरण, आरोग्य भवन, मुंबई यांच्यामार्फत करण्यात यावी.

२. सदर बाबीवरील खर्च “मागणी क्रमांक-एस-०१, मुख्यलेखाशीर्ष २२१०-वैद्यकीय व सार्वजनिक आरोग्य, ०६-सार्वजनिक आरोग्य, १०७ सार्वजानिक आरोग्य प्रयोगशाळा, (०१)(०४) अन्न सुरक्षा प्रणालीचे बळकटीकरण (राज्य हिस्सा ४० टक्के) (कार्यक्रम), ३१-सहायक अनुदान सांकेतांक क्र.२२१०K०५२” या लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पीय अधिवेशन फेब्रुवारी २०२४ मध्ये मंजूर करण्यात आलेल्या पुरवणी अनुदानामधून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम,भाग-२, दि.१७.०४.२०१५ व दि. २०.०९.२०१९ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग-पहिला, उपविभाग दोन, मधील अनुक्रमांक १ नियम क्र २ व ७, सहपत्र ४ अनुक्रमांक १० व अनुक्रमांक ४५ नियम क्र. १६९ तसेच अनुक्रमांक ४-अ नियम क्र. ७ अनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३२६१०५१२७८११७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ARVIND BHIMRAO MORE

Digitally signed by ARVIND BHIMRAO MORE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=203af2dfba7db2a4824298a34f2c9294f93396f53d7f87cd4d69fecf5cf7005f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9246B8CCD2E2CB10707678D45EA1AD26CC1E4D7BFF7BD2AA1F253A716B8C448B, cn=ARVIND BHIMRAO MORE
Date: 2024.03.26 14:07:22 +05'30'

(अ. भि. मोरे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल १/२, महाराष्ट्र ( लेखा व लेखापरिक्षा) / लेखा व अनुज्ञेयता, मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र वैद्यकीय वस्तु खरेदी प्राधिकरण, आरोग्य भवन, मुंबई
४. उपसंचालक, आरोग्य सेवा, राज्य सार्वजानिक आरोग्य प्रयोगशाळा पुणे
५. सहाय्यक संचालक ( लेखा व लेखापरिक्षा ),आरोग्य सेवा, पुणे.
६. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), मुंबई/ पुणे.
७. उपसंचालक, आरोग्य सेवा, पुणे मंडळ, पुणे.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
९. कक्ष अधिकारी, विनियम कार्यासन, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.कक्ष अधिकारी नियोजन विभाग का. १४७२, मंत्रालय, मुंबई
११.अवर सचिव ( अर्थसंकल्प ), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.अवर सचिव (आरोग्य-३), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.निवडनस्ती ( आरोग्य-३अ ).